**कौशल्य, रोजगार, उद्योजकता व नाविन्यता विभाग (खुद्द) आस्थापनेवरील अस्थायी पदांना दि.०१/०३/२०२२ ते दि.३१/०८/२०२२ पर्यन्त मुदतवाढ देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**कौशल्य, रोजगार, उद्योजकता व नाविन्यता विभाग**
**शासन निर्णय क्रमांक- अस्थाप-२०२० /प्र.क्र.५४ /प्रशा-१**
दुसरा मजला, मादाम कामा रोड,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक :- १६ मार्च, २०२२.

वाचा :-

१) शासन निर्णय, रो.व स्व.रो. विभाग, क्रमांक- आढावा- २००१/प्र.क्र.१०९ /प्रशा-१, दि. ०५/०३/२००३
२) शासन निर्णय, कौ.वि.व उ. विभाग, क्रमांक- कौविउ -२०१५/प्र.क्र.२१ /प्रशा-१ दि. ०६/०४/२०१५.
३) शासन निर्णय, कौ.वि.व उ. विभाग, क्रमांक - कौविउ -२०१५/प्र.क्र.०७ /प्रशा-१ दि.११/०६/२०१५.
४) शासन निर्णय, कौ.वि.व उ. विभाग, क्रमांक - कौविउ-२०१६/ प्र.क्र.५०/ प्रशा-१, दि. १८ /०३/२०१६.
५) शासन निर्णय, कौ.वि.व उ. विभाग, क्रमांक - कौविउ-२०१६/ प्र.क्र.५० / प्रशा-१, दि. ०४/१०/२०१६.
६) शासन निर्णय, कौ.वि.व उ. विभाग, क्रमांक - कौविउ-२०१७/ प्र.क्र.७३ / प्रशा-१, दि. ०७/०३/२०१७.
७) शासन निर्णय, कौ.वि.व उ. विभाग, क्रमांक-कौविउ-२०१९/प्र.क्र.४५/प्रशा-१, दि. २७/०३/२०१९
८) शासन निर्णय, कौ.वि.व उ. विभाग, क्रमांक-अस्थाप-२०२०/प्र.क्र.५४/प्रशा-१, दि. ०२/०३/२०२०
९) शासन निर्णय, कौ.वि.व उ. विभाग, क्रमांक-अस्थाप-२०२०/प्र.क्र.५४/प्रशा-१, दि. १०/०९/२०२०
१०) शासन निर्णय, वित्त विभाग, क्रमांक- पदनि २०१६ / प्र.क्र.८ /१६ /आ.पु.क., दि.१५.०२.२०२१
११) शासन निर्णय, कौ.वि.रो.व उ. विभाग, क्रमांक-अस्थाप-२०२०/प्र.क्र.५४/प्रशा-१, दि. २३/०२/२०२१.
१२) शासन निर्णय, वित्त विभाग, क्रमांक- पदनि २०१६ / प्र.क्र.८ /१६ /आ.पु.क., दि.१०.०८.२०२१.
१३) शासन निर्णय, वित्त विभाग, क्रमांक- पदनि २०१६ / प्र.क्र.८ /१६ /आ.पु.क., दि.२२.०२.२०२२.

प्रस्तावना :-

कौशल्य, रोजगार, उद्योजकता व नाविन्यता विभाग (खुद्द) च्या आस्थापनेवरील पदांचा सुधारीत आकृतिबंध वरील संदर्भ क्र-१ ते क्र.५ येथील शासन निर्णयांन्वये निश्चित करण्यात आलेला आहे.

२. संदर्भ क्र. ९ येथील विभागाच्या शासन निर्णयान्वये विभाग (खुद्द) च्या आस्थापनेवरील ४८ अस्थायी पदांना यापूर्वी दि.०१/०९/२०२१ ते २८/०२/२०२२ पर्यंत मुदतवाढ देण्यात आलेली आहे.

३. वित्त विभागाच्या उपरोक्त संदर्भ क्र.१३ येथील दि.२२/०२/२०२२ अन्वये विभागातील अस्थायी पदांना दिनांक ०१/०३/२०२२ ते दिनांक ३१/०८/२०२२ पर्यंत मुदतवाढ देण्यासाठी प्रशासकीय विभागांना अधिकार प्रदान करण्यात आले आहेत.

**शासन निर्णय :-**

त्या अनुषंगाने कौशल्य, रोजगार, उद्योजकता व नाविन्यता विभाग (खुद्द) आस्थापनेवरील विविध संवर्गातील ४८ अस्थायी पदांना दिनांक ०१/०३/२०२२ ते दिनांक ३१/०८/२०२२ पर्यंत मुदतवाढ देण्यास शासन मंजुरी देण्यात येत आहे. याबाबतचा सविस्तर तपशील सोबतच्या विवरणपत्र "अ "मध्ये दर्शविण्यात आलेला आहे.

४. कौशल्य, रोजगार, उद्योजकता व नाविन्यता विभागातील ४८ अस्थायी पदांसाठी होणारा खर्च मागणी क्रमांक, "झेडए-२, २२५१, सेक्रेटरीएट सामाजिक सेवा सेक्रेटरीएट (०१) (०१) रोजगार व स्वयंरोजगार विभाग (२२५१ ०५१६) दत्तमत" या लेखाशिर्षाखाली वेळोवेळी उपलब्ध होणाऱ्या मंजूर तरतूदीतून भागविण्यात यावा व तो त्याच लेखा शिर्षाखाली खर्ची टाकण्यात येईल.

५. शासन निर्णय वित्त विभागाच्या उक्त संदर्भ क्र.१३ येथील दिनांक २२/०२/२०२२ रोजीच्या शासन निर्णयान्वये प्रशासकीय विभागांना प्रदान करण्यात आलेल्या अधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करुन देण्यात आला असून संकेतांक २०२२०३१६१३३६१४२४०३ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावांने,

Digitally signed by Varsha Munja Bharose
Date: 2022.03.16 13:40:08 +05'30'

**( व. मुं. भरोसे )**
उप सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

०१. महालेखापाल, महाराष्ट्र राज्य-१ (लेखा व अनुज्ञेयता)/ (लेखा परीक्षा), मुंबई.
०२. अधिदान व लेखा अधिकारी, अधिदान व लेखा अधिकारी कार्यालय, मुंबई.
०३. निवासी लेखा परीक्षा अधिकारी,मुंबई.
०४. वित्त विभाग, (व्यय-६/वित्तीय सुधारणा), मंत्रालय,मुंबई.
०५. सामान्य प्रशासन विभाग ( कार्यासन १८, र. व का.),मंत्रालय,मुंबई.
०६. कार्यासन अधिकारी,रोख शाखा,कौ. रो. उ. व ना. विभाग,मंत्रालय, मुंबई.
०७. निवड नस्ती (प्रशा-१).

## विवरणपत्र -अ

शासन निर्णय क्रमांक- अस्थाप-२०२० /प्र.क्र.५४ /प्रशा-१, दिनांक ०१.०९.२०२१ अन्वये ४८ अस्थायी पदांना दि.०१/०३/२०२२ ते दि.३१/०८/२०२२ पर्यंत मुदतवाढ देणेबाबत.

| **अ.क्र.** | **पदांचा संवर्ग** | **पदाची संख्या** | **वेतनश्रेणी (७ व्या वेतन आयोगानुसार सुधारीत संरचनेतील वेतनश्रेणी)** |
|---|---|---|---|
| १ | प्रधान सचिव / सचिव | १ | संवर्ग पद |
| २ | उप सचिव | २ | S-२५ : ७८८००-२०९२०० |
| ३. | विशेष कार्य अधिकारी( उप सचिव दर्जा गट -अ ) | २ | S-२५ : ७८८००-२०९२०० |
| ४ | अवर सचिव | १ | S-२३ : ६७७००-२०८७०० |
| ५ | वरिष्ठ स्वीय सहायक | १ | S-२३ : ६७७००-२०८७०० |
| ६ | निवडश्रेणी लघुलेखक | १ | S-१६ : ४४९००-१४२४०० |
| ७ | कक्ष अधिकारी | ६ | S-२० : ५६१००-१७७५०० |
| ८ | सहायक कक्ष अधिकरी | ९ | S-१४ : ३८६००-१२२८०० |
| ९ | संगणक सहायक | ३ | S-१४ : ३८६००-१२२८०० |
| १० | उच्चश्रेणी लघुलेखक | २ | S-१५ : ४१८००-१३२३०० |
| ११ | निम्नश्रेणी लघुलेखक | ३ | S-१४ : ३८६००-१२२८०० |
| १२ | लघुटंकलेखक | १ | S-८ : २५५००-८११०० |
| १३ | रोखपाल (लिपीक-टंकलेखक) | १ | S-६ : १९९००-६३२०० |
| १४ | देयक-लिपीक (लिपीक-टंकलेखक) | १ | S-६ : १९९००-६३२०० |
| १५ | (लिपीक-टंकलेखक) | ८ | S-६ :१९९००-६३२०० |
| १६ | वाहन चालक | २ | S-६ : १९९००-६३२०० |
| १७ | शिपाई | ४ | S-१ : १५०००-४७६०० |
| **एकूण** | | ४८ | **अस्थायी पदे** |